**सन २००९-१० मधील अर्थसंकल्पीय अनुदानाचे वितरण**
**विमान चालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय, क्रमांक : बीयुडी -१००८/प्र.क्र.६९१/२८-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १६ सप्टेंबर,२००९.

वाचा : १) सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्रमांक : बीयुडी १००९/प्र.क्र.६८/ २००९/ पंचवीस , दिनांक २४ मार्च, २००९.
२) सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्रमांक : बीयुडी १००९/प्र.क्र.६८/ २००९/ पंचवीस , दिनांक ८ जुलै, २००९.

**प्रस्तावना :-** महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २००९ (महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) अधिनियम, २००९ यांच्या अनुसूचीच्या स्तंभ चार मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांसह) यांस विधीमंडळाने मंजूरी दिली असून महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिलेली आहे आणि ते २००९ चा अधिनियम क्रमांक १२ (बारा) या स्वरुपात महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-चार, दि. २० जून, २००९ यामध्ये प्रसिध्द करण्यात आलेले आहे.
१.१उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेऊन संदर्भाधीन दि. २४ मार्च, २००९ च्या परिपत्रकातील स्तंभ-चारमध्ये दर्शविलेले संपूर्ण अनुदान संदर्भाधीन दि.८ जुलै, २००९ च्या परिपत्रकान्वये संबंधित प्रशासकीय विभागाच्या स्वाधीन करण्यात आले आहे. त्यनुसार, विमान चालन संचालनालयासाठी सन २००९-१० या आर्थिक वर्षात एकूण रु. ३,६५,३३,०००/- (रुचये तीन कोटी पासष्ट लक्ष तेहतीस हजार फक्त) एवढी तरतूद मंजूर आहे. सदर तरतुदीपैकी, रु. १,२२,२९,०००/- (रुपये एक कोटी बावीस लक्ष एकोणतीस हजार फक्त) एवढी तरतूद लेखानुदानाव्दारे दि. २४ मार्च, २००९ च्या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागामार्फत वितरणासाठी उपलब्ध करण्यात आली आहे.

**शासन निर्णय** :

२. . विमानचालन संचालनालय, मुंबई अंतर्गत शासनमान्य बाबींच्या खर्चासाठी चालू आर्थिक वर्षी ऑगस्ट, २००९ ते नोव्हेंबर, २००९ या चार महिन्यांसाठी रु. १,६२,४४,०००/- (रुपये एक कोटी बासष्ट लक्ष चव्वेचाळीस हजार फक्त) तरतूद मासिक निधी वितरण प्रणालीव्दारे मंजूर करण्यात येत आहे. याप्रित्यर्थचा खर्च मासिक निधी वितरण प्रणालीनुसार करण्यांत यावा. तसेच, सदर तरतूदीच्या मर्यादेतच खर्च करण्यात यावा. सदर तरतुदींचा तपशील सोबतच्या विवरणपत्रामध्ये नमूद केला आहे.
३. वरीलप्रमाणे मंजूर केलेल्या रु.१,६२,४४,०००/- तरतूदीचे संदर्भात सहाय्यक संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. याप्रित्यर्थचा बाबनिहाय मासिक खर्चाचा प्रगती अहवाल महालेखापाल / अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई आणि सामान्य प्रशासन विभागाकडे प्रत्येक महिन्याच्या १५ तारखेपर्यंत सादर करावा. अखर्चित अनुदान शासनाच्या मान्यतेशिवाय खर्च करु नये.

५. याप्रित्यर्थचा चालू आर्थिक वर्षीचा खर्च खालील लेखाशीर्षांतर्गत मंजूर तरतुदीमधून करण्यात यावा आणि त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा :-

मागणी क्रमांक ए-४, २०७०, इतर प्रशासनिक सेवा, ११४, परिवहन साधनांची खरेदी व परिरक्षण, (००)(०२) विमानचालन सल्लागार, महाराष्ट्र शासन (२०७० ०१५६)

६. हा शासन निर्णय संदर्भाधीन सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक दि. ८ जुलै, २००९ अन्वये प्रशासकीय विभागांस प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २००९०९१७१६३३३७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-

**( अं. वि. अंभिरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१. संचालक/सहायक संचालक, विमान चालन संचालनालय, हँगर क्र. ६, जुहू विमानतळ, मुंबई
२. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६. वित्त विभाग, का.-अर्थसंकल्प-१४/ व्यय-४, मंत्रालय,मुंबई,
७. उप सचिव (विमानचालन), सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय, मुंबई
८.कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, का.क्र.२५, मंत्रालय, मुंबई ३२,
९. निवड नस्ती.

## विमानचालन संचालनालय सन २००९-१० करिता माहे ऑगस्ट, २००९ ते नोव्हें. २००९ चा कॅश फ्लो

( रुपये हजारात)

| अ. क्र. | उद्दिष्ट | सन २००९ - १० साठी उपलब्ध तरतूद | प्राप्त लेखानुदान | लेखा-नुदाना तील खर्च | ०८ / २००९ | ०९ / २००९ | १० /२००९ | ११ / २००९ | एकूण | शिललक अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | ०१ - वेतन | १,१३,३९ | ३७,९७ | २६,९७ | २०,४३ | ९,४३ | ९,४३ | ९,४३ | ४८.७२ | २६,७० |
| २ | ०६ - दूरध्वनी, वीज व पाणी | ५० | १६ | १६ | ३४ | -- | -- | --- | ३४ | -- |
| ३ | ११ - देशांतर्गत प्रवास | ८० | २६ | ४ | ८ | ७ | ७ | ७ | २९ | २५ |
| ४ | १३ - कार्यालयीन खर्च | ६६,३३ | २२,२१ | २१,६९ | ५,७२ | ५,७२ | ५,७२ | ५,७२ | २२,८८ | २१,२४ |
| ५ | १४ - भाडे पट्टी व कर | ३२,०० | १०,७१ | ५,६५ | ३,०४ | ३,०४ | ३,०४ | ३,०४ | १२,१६ | ९,१३ |
| ६ | २० - इतर प्रशा. खर्च | २ | --- | -- | -- | २ | -- | -- | २ | -- |
| ७ | २७ - लहान बांधकामे | २५,९४ | ८,६८ | ८,५४ | ७,१० | ६,९६ | ३,२० | -- | १७,२६ | -- |
| ८ | ५० - इतर खर्च | ७०,०० | २३,४४ | २,४८ | ५,८२ | ५,८२ | ५,८२ | ५,८२ | २३,२८ | २३,२८ |
| ९ | ५१ - मोटार वाहने | ७० | २३ | २२ | १२ | १२ | १२ | ११ | ४७ | -- |
| १० | ५२ - यंत्र सामग्री | ५५,६५ | १८,६३ | -- | ९,२५ | ९,२७ | ९,२५ | ९,२५ | ३७,०२ | -- |
|  | एकूण | ३,६५,३३ | १,२२,२९ | ६५,७५ | ५१,९० | ४०,४५ | ३६,६५ | ३३,४४ | १६२,४४ | ८०६० |